**शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयातील अध्यापकांना गुणवत्ता सुधार योजनेंतर्गत उच्च शिक्षणाकरीता प्रतिनियुक्तीवर पाठविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- प्रतिनि-२०२०/प्र.क्र. (६४/२०)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार इमारत, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० ऑगस्ट, २०२०.

संदर्भ- १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक-प्रतिनि-२०९५/ १९५५७/ (१९५/९५)/ तांशि-४, दिनांक २०/११/१९९६.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्रमांक-प्रतिनि-२०९५/ १९५५७/ (१९५/९५)/ तांशि-४, दिनांक २८/१०/१९९८.
३) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र. ४/आस्था/अभि. पी.एच.डी/२०२०/२१५ दि.०२/०७/२०२०.

**शासन आदेश:-**

शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयातील खाली नमूद केलेल्या अध्यापकांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ येथे दर्शविलेल्या संस्थेत गुणवत्ता सुधार योजेनेंतर्गत उच्च शिक्षणासाठी (पी.एच.डी अभ्यासक्रमासाठी) सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षापासून पुढील ३ वर्षांकरीता निवड झालेली आहे.

| अ.क्र. | अध्यापकाचे नाव, पदनाम व कार्यरत संस्थेचे नाव | पी.एच.डी साठी प्रतिनियुक्तीने पाठविण्यात येत असलेल्या संबंधित संस्थेचे नाव |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | श्री. डॅनी जे. परेरा, सहायक प्राध्यापक, संगणक अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी | भारतीय प्रौद्योगिकी संस्थान (आय.आय.टी) खरगपूर |
| २. | श्री. पियुष प्र. गजभिये, सहायक प्राध्यापक, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती | विश्वेश्वरय्या राष्ट्रीय प्रौद्योगिकी संस्थान, नागपूर |
| ३. | श्री. विक्रम प्र. तितरमारे, सहायक प्राध्यापक, यंत्र अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, नागपूर | जाधवपूर विद्यापीठ, कोलकता |

२. त्यानुषंगाने उपरोक्त अध्यापकांना संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन निर्णयामध्ये नमूद खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून, सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षापासून ०३ वर्षांच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीवर पाठविण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

१. प्रतिनियुक्ती पूर्ण निर्धारित कालावधीकरिता राहील.

२. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधीत अध्यापकाच्या जागी पर्यायी व्यवस्था म्हणून अन्य अध्यापकाची नियुक्ती करण्यास मान्यता राहील.

३. उपरोक्त अध्यापकांना खालील अट क्र.८ च्या अधीन राहून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालखंडात नियमानुसार अनुज्ञेय असलेले वेतन व भत्ते देय राहतील.

४. उपरोक्त अध्यापकांना ज्या संस्थेत प्रतिनियुक्तीवर पाठविण्यात आले आहे, त्या संस्थेने त्यांना त्यांच्या वेतनाव्यतिरिक्त विद्यावेतन/ शिष्यवृत्ती दिल्यास, ती स्वीकारण्यास त्यांना परवानगी असेल.

५. प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी जाण्यासाठी किंवा प्रतिनियुक्तीच्या कालावधीत तसेच प्रतिनियुक्ती संपल्यावर मुख्यालयात परत येण्यासाठी त्यांना प्रवासभत्ता वा दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

६. उपरोक्त अध्यापकांना त्यांच्या उर्वरित सेवा कालावधीत कधीही अध्यापन रजा घेता येणार नाही व तसे बंधपत्र प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी त्यांना संबंधित प्राचार्यांमार्फत संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे सादर करावे लागेल.

७. संबंधित अभ्यासक्रमासाठी करारनिर्दिष्ट काळापेक्षा जास्त कालावधी वाढवून मिळण्यास त्यांनी अर्ज केल्यास प्रतिनियुक्तीच्या वाढलेल्या कालावधीसाठी त्यांची देय व अनुज्ञेय रजा समजण्यात येईल.

८. प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर शासनाची सलग ०६ वर्षे सेवा करण्याचे बंधपत्र त्यांना प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी द्यावे लागेल. हे बंधपत्र त्यांना शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-१०६८/ डी-१०/, दिनांक १५/१०/१९९८ सह शासन ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०६९, दिनांक २१/०६/१९७९ मध्ये विहीत केल्याप्रमाणे संबंधित प्राचार्यांमार्फत संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे सादर करावे लागेल.

९. उपरोक्त अध्यापक हे जर त्यांचे प्रशिक्षण अर्धवट सोडून येतील किंवा बंधपत्राप्रमाणे शासनाची सेवा करणार नाहीत, तर त्यांच्याकडून शासनाने त्यांच्यावर केलेला संपूर्ण खर्च प्रचलित व्याजासह वसूल करण्यात येईल.

१०. प्रतिनियुक्तीचा कालावधी सेवा काळ म्हणून समजण्यात येईल.

११. सदर प्रशिक्षणासाठीची प्रतिनियुक्ती त्यांच्यापेक्षा ज्येष्ठ असलेल्या कर्मचा-यांच्या अगोदर पदोन्नतीसाठी आधारभूत ठरु शकणार नाही.

३ संबंधित अध्यापकांना प्रतिनियुक्तीसाठी कार्यमुक्त करण्यापूर्वी उपरोक्त नमूद क्र. २ (६) व २ (८) येथील बाबींवरील बंधपत्रे अध्यापकांकडून घेण्याची संबंधितांनी दक्षता घ्यावी. सदर अध्यापकांना संस्थेतून कार्यमुक्त केल्याच्या दिनांकापासून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी सुरु होईल.

४. असे प्रमाणित करण्यांत येते की, उपरोक्त अध्यापकांना गुणवत्ता दर्जा सुधार कार्यक्रमानुसार पी.एच.डी. अभ्यासक्रमासाठी प्रतिनियुक्तीवर पाठविण्यांत आले नसते तर, वरील अभ्यासक्रमाच्या काळात ते त्याच पदावर स्थानापन्न राहीले असते.

५. सदर आदेश संदर्भाधीन क्र.१ व २ येथे नमूद शासन निर्णयातील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२०१६३२१०२९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2020.08.20 16:38:16 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति: -**

१. श्री. डॅनी जे. परेरा, सहायक प्राध्यापक, संगणक अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
२. श्री. पियुष प्र. गजभिये, सहायक प्राध्यापक, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
३. श्री. विक्रम तितरमारे, सहायक प्राध्यापक, यंत्र अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, नागपूर (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत:-**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. सहसंचालक,तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे/अमरावती/नागपूर
४. प्राचार्य,शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी/ शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती/ शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, नागपूर (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/अमरावती/नागपूर
७. निवड नस्ती/तांशि-१.